# विक्रीकर निरीक्षक परीक्षा

**१. संवर्ग व पदे याबाबतचा संक्षिप्त तपशील :-**

**१.१** राज्य शासनाच्या सेवेतील विक्रीकर निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित) संवर्गातील पदे शासनाच्या मागणीनुसार व पदांच्या उपलब्धतेनुसार सदर परीक्षेमधून भरण्यात येतात.

**१.२ पदांचा तपशील :-**

१.२.१ **संवर्ग :-** अराजपत्रित, गट - ब.

१.२.२ **नियुक्तीचे ठिकाण :-** राज्य शासनाच्या विक्रीकर विभागाच्या महाराष्ट्रातील कोणत्याही कार्यालयात.

१.२.३ **वेतनबँड व ग्रेड वेतन :** - रुपये ९३००-३४८००,४३०० अधिक महागाई भत्ता व नियमाप्रमाणे देय इतर भत्ते.

१.२.४ **उच्च पदावर बढतीची संधी :**- ज्येष्ठता व पात्रतेनुसार विक्रीकर अधिकारी व त्यावरील पदे.

**१.३** शासनाच्या मागणीनुसार भरावयाच्या पदांचा तपशील, पदसंख्या, आरक्षण, अर्हता, इत्यादी बाबी जाहिरात / अधिसूचनेद्वारे उमेदवारांना उपलब्ध करून देण्यात येतील.

**२. परीक्षेचे टप्पे :-**

**२.१** प्रस्तुत परीक्षा एकूण दोन टप्प्यात घेण्यात येते :-

**(१)** पूर्व परीक्षा - ३०० गुण. **(२)** मुख्य परीक्षा - २०० गुण.

**२.२** पूर्व परीक्षा ही मुख्य परीक्षेसाठी उमेदवारांची संख्या विहित मर्यादेत सिमित करण्यासाठी घेण्यात येते. या करीता पूर्व परीक्षेसाठी आयोगाने विहित केलेल्या किमान सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांस मुख्य परीक्षेसाठी पात्र समजण्यात येते.

**२.३** पूर्व परीक्षेचे गुण अंतिम निवडीच्या वेळी विचारात घेतले जाणारी नाहीत. तसेच, पूर्व परीक्षेचे गुण उमेदवारांना कळविले जाणार नाहीत.

**३. अर्हता :-**

**३.१** मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी किंवा महाराष्ट्र शासनाने विहित केलेली समतुल्य अर्हता.

**३.२** मराठीचे ज्ञान आवश्यक.

**३.३** पदवीच्या शेवटच्या वर्षाच्या परीक्षेस बसलेले उमेदवार पूर्व परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र असतील. परंतु मुख्य परीक्षेकरीता अर्हताप्राप्त ठरल्यास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी विहित पद्धतीने आवश्यक माहिती व परीक्षा शुल्क सादर करण्याच्या अंतिम दिनांकापर्यंत पदवी परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य राहील.

**३.४** अंतर्वासिता किंवा कार्यशाळेतील प्रत्यक्ष कामाचा अनुभव आवश्यक असेल अशा पदवी धारकाने ही अट मुख्य परीक्षेची माहिती स्वीकारण्याच्या विहित दिनांकापर्यंत पूर्ण केली असली पाहिजे.

**४ शुल्क (फी) :-**

**४.१** प्रस्तुत भरतींकरिता आयोगाकडून आकारण्यात येणारे शुल्क खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | परीक्षेचे नांव | रुपये | |
|---|---|---|---|
| | | अमागास | मागासवर्ग |
| (१) | पूर्व परीक्षा | ३६५ | २६५ |
| (२) | मुख्य परीक्षा | ५१५ | ३१५ |

**४.२** वि.जा.(अ),भ.ज.(ब),भ.ज.(क),भ.ज.(ड), वि.मा.प्र., इ.मा.व., प्रवर्गातील उन्नत व प्रगत गटात (क्रीमी लेअर) मोडणाऱ्या उमेदवारांनी त्यांना आरक्षणाचा व वयोमर्यादेचा फायदा देय नसल्याने त्यांनी अमागास उमेदवारांप्रमाणे परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

**४.३** क्रीमी लेअर संदर्भातील उत्पन्नाची मर्यादा तसेच अन्य तद्अनुषंगिक बाबी शासनाने वेळोवेळी जारी केलेल्या आदेशानुसार राहतील.

**४.४** दिनांक १ जानेवारी, १९६४ ते २५ मार्च,१९७१ या कालावधीत पूर्व पाकिस्तानातून स्थलांतर क रून भारतामध्ये आलेल्या आणि दिनांक १ जून,१९६३ नंतर स्थलांतर करून भारतात आलेल्या मूळचे भारतीय असलेल्या श्रीलंकेतील स्वदेश प्रतावर्ती उमेदवारांनी कोणतेही परीक्षा शुल्क भरण्याची आवश्यकता नाही.

**५. पूर्व परीक्षा :-**

**५.१** परीक्षा योजना :-

प्रश्नपत्रिका - एक. प्रश्नपत्रिकेचा तपशील खालीलप्रमाणे:-

| विषय व संकेतांक | प्रश्नसंख्या | एकुण गुण | दर्जा | माध्यम | परीक्षेचा कालावधी | प्रश्नपत्रिकेचे स्वरुप |
|---|---|---|---|---|---|---|
| सामान्य क्षमता चाचणी (संकेतांक क्र. 012) | 100 | 100 | पदवी | मराठी व इंग्रजी | एक तास | वस्तुनिष्ठ बहुपर्यायी |

**५.२ अभ्यासक्रम :-** सविस्तर अभ्यासक्रम आयोगाच्या वेबसाईटवर आहे.

**५.३ परीक्षा केंद्र :-**

५.३.१ खालील ठिकाणी सदर परीक्षा घेण्यात येईल :-

| केंद्र | संकेतांक | केंद्र | संकेतांक | केंद्र | संकेतांक |
|---|---|---|---|---|---|
| अहमदनगर | ११ | हिंगोली | २३ | उस्मानाबाद | ३६ |
| अकोला | १२ | जळगाव | २४ | परभणी | ३७ |
| अलिबाग | १३ | जालना | २५ | पुणे | ३८ |
| अमरावती | १४ | कोल्हापूर | २६ | रत्नागिरी | ३९ |
| औरंगाबाद | १५ | कुडाळ | २७ | सांगली | ४० |
| बीड | १६ | लातूर | २८ | सातारा | ४१ |
| भंडारा | १७ | मुंबई (मध्य) | ३० | सोलापूर | ४२ |
| बुलढाणा | १८ | मुंबई (पश्चिम) | ३१ | ठाणे | ४३ |
| चंद्रपूर | १९ | नागपूर | ३२ | वर्धा | ४४ |
| धुळे | २० | नांदेड | ३३ | वाशीम | ४५ |
| गडचिरोली | २१ | नंदुरबार | ३४ | यवतमाळ | ४६ |
| गोंदिया | २२ | नाशिक | ३५ | पालघर | ४७ |

५.३.२ उपरोक्त परीक्षाकेंद्रांमधून कोणतेही एक केंद्र अर्ज सादर करताना निवडणे आवश्यक आहे.

५.३.३ उपरोक्त परीक्षाकेंद्रांमध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ अथवा बदल होऊ शकतात.

५.३.४ विहित पद्धतीने माहिती सादर करताना उमेदवाराने निवडलेले परीक्षा केंद्र व उपलब्धतेनुसार जिल्हा केंद्रावरील विविध उपकेंद्रावर पात्र उमेदवारांना प्रवेश देण्यात येईल.

५.३.५ एखादे केंद्र कार्यान्वित होऊ शकले नाही तर त्या केंद्रावरील उमेदवारांची व्यवस्था जवळच्या दुस-या जिल्हा केंद्रावर करण्यात येईल. असा बदल केल्यास त्याबाबतची सूचना संबंधितांना दिली जाईल.

५.३.६ एकदा निवडलेल्या परीक्षा केंद्रामध्ये अथवा आयोगाने निश्चित केलेल्या उपकेंद्रामध्ये बदल करण्याची विनंती कोणत्याही कारणास्तव मान्य करण्यात येणार नाही.

**५.४ पूर्व परीक्षेचा निकाल :-**

**५.४.१** वस्तुनिष्ठ स्वरुपांच्या उत्तरपत्रिकांचे मुल्यांकन करताना उत्तरपत्रिकेत नमूद केलेल्या योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच प्रत्येक चार चुकीच्या उत्तरामागे एका प्रश्नाचे गुण एकूण गुणांमधून वजा करण्यात येतील.

**५.४.२** भरावयाच्या एकूण पदांच्या सुमारे ८ पट उमेदवार मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र होतील, अशा रीतीने प्रथम टप्प्यात गुणांची सीमारेषा (Cut Off Line) निश्चित करण्यात येईल. तद्नंतर, दुस-या टप्प्यात प्रत्येक प्रवर्गातील पदांसाठी १० पट उमेदवार उपलब्ध होतील, अशा रीतीने सीमारेषा खाली ओढली जाईल. तथापि, अशा पध्दतीने मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी दुस-या टप्प्यात पात्र ठरलेले अतिरिक्त उमेदवार केवळ त्यांच्या राखीव प्रवर्गासाठीच्या पदावरच निवडीसाठी पात्र असतील.

**५.४.३** केवळ सर्वसाधारण (अमागास) उमेदवारांच्या सीमारेषेच्या आधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची उमेदवारी अंतिम निवडीच्या वेळी सर्वसाधारण (अमागास) पदासाठी विचारात घेतली जाईल. सर्वसाधारण (अमागास) उमेदवारांसाठी असलेली सीमारेषा शिथिल करुन मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेले उमेदवार अंतिम शिफारशीच्या वेळी फक्त संबंधित आरक्षित पदासाठी पात्र ठरतील.

**५.४.४** प्रत्येक प्रवर्ग / उपप्रवर्गासाठी आयोगाने निश्चित केलेल्या सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांना त्यांनी पूर्व परीक्षेच्या अर्जामध्ये दिलेल्या माहितीच्या आधारे, ते विहित अटींची पूर्तता करतात असे समजून निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येईल.

**५.४.५** अशा रितीने मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची यादी संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाच्या तसेच आयोगाच्या कार्यालयाच्या सूचना फलकावर व आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिद्ध करण्यात येईल.

**५.४.६** मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांचा निकाल जाहीर झाल्याची बातमी राज्यातील प्रमुख वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करण्यात येईल. तसेच, मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या प्रत्येक उमेदवाराला ईमेलद्वारे व मोबाईल क्रमांकावर एसएमएसद्वारे वैयक्तिकरित्या कळविण्यात येईल.

**५.४.७** पूर्व परीक्षा ही मुख्य परीक्षेच्या प्रवेशाकरिता उमेदवारांची संख्या मर्यादित करण्याच्या दृष्टिने घेण्यात येणारी चाळणी परीक्षा असल्याने मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र न ठरलेल्या उमेदवारांच्या उत्तरपत्रिकांची फेरतपासणी केली जात नाही अथवा यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या अभिवेदनावर कार्यवाही केली जात नाही.

## ६. मुख्य परीक्षा :-

**६.१ परीक्षेचे टप्पे :-** एक. लेखी परीक्षा

**६.२ परीक्षेस प्रवेश :-**

**६.२.१** पूर्व परीक्षेमध्ये अर्हताप्राप्त होणा-या आणि आवश्यक शैक्षणिक अर्हता व अन्य अटींची पूर्तता करणाऱ्या उमेदवारास मुख्य परीक्षेकरिता प्रवेश दिला जातो.

**६.२.२** मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांना वैयक्तिकरित्या ईमेलद्वारे व मोबाईल क्रमांकावर एसएमएसद्वारे कळविण्यात येईल. त्यावेळी उमेदवाराने मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी आयोगाने विहित केलेल्या ऑनलाईन पद्धतीने परीक्षा केंद्र निवडून चलनाद्वारे परीक्षाशुल्क सादर करणे आवश्यक राहील. त्याशिवाय उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येणार नाही.

**६.२.३** प्रस्तुत पदाच्या पूर्व परीक्षेसाठी अर्ज करतेवेळी आवश्यक ती शैक्षणिक अर्हता नसल्यास व शैक्षणिक अर्हता मुख्य परीक्षेकरिता आवश्यक माहिती व परीक्षा शुल्क सादर करण्याच्या अंतिम दिनांकापर्यंत प्राप्त केल्यास,अशा उमेदवाराला शैक्षणिक अर्हता प्राप्त केल्याचा दिनांक नमूद करता येईल. इतर कोणत्याही दाव्यामध्ये बदल करता येणार नाही.

**६.३ परीक्षा योजना :-**

**६.३.१ एकूण गुण :- २००**

**६.३.२ प्रश्नपत्रिकांची संख्या :-** दोन. प्रत्येक प्रश्नपत्रिकेचा तपशील खालीलप्रमाणे :-

| पेपर क्रमांक व संकेतांक | विषय | गुण | प्रश्नसंख्या | दर्जा | माध्यम | कालावधी | प्रश्नपत्रिकेचे स्वरुप |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ ( संकेतांक ००२ ) | मराठी व | ६० | ६० | मराठी -बारावी | मराठी | एक तास | वस्तुनिष्ठ बहुपर्यायी |
| | इंग्रजी | ४० | ४० | इंग्रजी - पदवी | इंग्रजी | | |
| २ ( संकेतांक ०२५) | सामान्य ज्ञान, बुध्दिमापन व विषयाचे ज्ञान | १०० | १०० | पदवी | इंग्रजी व मराठी | एक तास | |

**६.३.३ अभ्यासक्रम :-** सविस्तर अभ्यासक्रम आयोगाच्या वेबसाईटवर आहे.

**६.४ परीक्षा केंद्र :-**

६.४.१ खालील चार ठिकाणी सदर मुख्य परीक्षा घेण्यात येईल :-

| केंद्र | केंद्राचा सांकेतांक |
|---|---|
| औरंगाबाद | **१५** |
| मुंबई | **३०** |

| केंद्र | केंद्राचा सांकेतांक |
|---|---|
| नागपूर | **३२** |
| पुणे | **३८** |

६.४.२ उपरोक्त परीक्षाकेंद्रांमधून कोणतेही एक केंद्र मुख्य परीक्षेकरिता माहिती सादर करताना निवडणे आवश्यक आहे.

६.४.३ उपरोक्त परीक्षाकेंद्रांमध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ अथवा बदल होऊ शकतात.

६.४.४ विहित पद्धतीने माहिती सादर करताना उमेदवाराने निवडलेले परीक्षा केंद्र व उपलब्धतेनुसार जिल्हा केंद्रावरील विविध उपकेंद्रावर पात्र उमेदवारांना प्रवेश देण्यात येईल.

६.४.५ एखादे केंद्र कार्यान्वित होऊ शकले नाही तर त्या केंद्रावरील उमेदवारांची व्यवस्था जवळच्या दुसऱ्या जिल्हा केंद्रावर करण्यात येईल. असा बदल केल्यास त्याबाबतची सूचना संबंधितांना दिली जाईल.

६.४.६ एकदा निवडलेल्या परीक्षा केंद्रामध्ये अथवा आयोगाने निश्चित केलेल्या उपकेंद्रामध्ये बदल करण्याची विनंती कोणत्याही कारणास्तव मान्य करण्यात येणार नाही.

**७. लेखी परीक्षेचा निकाल :-**

**७.१** वस्तुनिष्ठ स्वरुपांच्या उत्तरपत्रिकांचे मुल्यांकन करताना उत्तरपत्रिकेत नमूद केलेल्या योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच प्रत्येक चार चुकीच्या उत्तरामागे एका प्रश्नाचे गुण एकूण गुणांमधून वजा करण्यात येतील.

**७.२** भरावयाच्या एकूण पदांपैकी प्रत्येक आरक्षित प्रवर्ग / उपप्रवर्गासाठी २ पट उमेदवार प्रमाणपत्र पडताळणीसाठी उपलब्ध होतील, अशा रितीने गुणांची किमान सीमारेषा (Cut Off Line) निश्चित करण्यात येईल. सदर सीमारेषा सर्व उमेदवारांसाठी एकच किंवा प्रत्येक सामाजिक प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी तसेच महिला, खेळाडू इत्यादींसाठी वेगवेगळी असेल.

**७.३** प्रत्येक प्रवर्ग / उपप्रवर्गासाठी आयोगाने निश्चित केलेल्या सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांना त्यांनी अर्जामध्ये दिलेल्या माहितीच्या आधारे, ते विहित अटींची पूर्तता करतात असे समजून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात प्रमाणपत्र पडताळणीसाठी पात्र समजण्यात येईल.

**७.४** विकलांग अथवा अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू या प्रवर्गाच्या किमान सीमा रेषेच्या आधारे मुलाखतीसाठी पात्र ठरणा- या उमेदवारास दोन्हीपैकी एकच सवलत घेता येईल.

**७.५** निकाल जाहीर झाल्याची बातमी राज्यातील प्रमुख वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करण्यात येईल.तसेच, मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या प्रत्येक उमेदवाराला ईमेलद्वारे व मोबाईल क्रमांकावर एसएमएसद्वारे वैयक्तिकरित्या कळविण्यात येईल.

**७.६** अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र असलेल्या विमुक्त जाती (अ), भटक्या जमाती (ब), विशेष मागास प्रवर्ग, भटक्या जमाती (क), भटक्या जमाती (ड), व इतर मागास वर्ग या प्रवर्गातील उमेदवार तसेच अपंग, महिला, माजी सैनिक व पात्र खेळाडू उमेदवार लेखी परीक्षेत केवळ त्यांच्यासाठी विहित केलेल्या निम्न सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त झाल्यास अंतिम शिफारशींच्या वेळी त्यांची उमेदवारी केवळ त्या त्या संबंधित प्रवर्गासाठी विचारात घेतली जाईल. निम्न सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची उमेदवारी सर्वसाधारण (अमागास) पदासाठी विचारात घेतली जाणार नाही.

८. **प्रमाणपत्र पडताळणी** :-

८.१ पात्र उमेदवारांना प्रमाणपत्र पडताळणीसाठी बोलविण्यात येईल.

८.२ आयोगाने निश्चित केलेल्या किमान सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/ शासन परिपत्रकातील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे तपासली जाईल.

८.३ अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्र सादर करणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी केली जाईल.

८.४ विहित कागदपत्रे सादर करू न शकणा-या उमेदवारांची उमेदवारी रद्द करण्यात येईल. तसेच त्याकरिता कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही.

८.५ वरीलप्रमाणे लेखी परीक्षेच्या निकालाचा आधारे पात्र ठरणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी आयोगाच्या कार्यक्रमानुसार तसेच आयोगाने निश्चित केलेल्या ठिकाणी व वेळेस घेण्यात येतील.

९. **अंतिम निकाल** :-

मुख्य परीक्षेमध्ये प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे गुणवत्ताक्रमानुसार यादी तयार करण्यात येईल. सदर गुणवत्ता यादीमधील समान गुण धारण करणा-या उमेदवारांचा प्राधान्यक्रम (Ranking) "**उमेदवारांना सर्वसाधारण सूचना**" मध्ये नमूद केलेल्या निकषानुसार ठरविण्यात येईल.

१०. **शिफारस** :-

१०.१ **"उमेदवारांना सर्वसाधारण सूचना"** मध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार उमेदवारांच्या शिफारसी शासनाच्या संबंधित विभागाकडे पाठविण्यात येईल.

१०.२ प्रस्तुत लेखी परीक्षेमधून शिफारसपात्र होण्याकरिता शतमत (**Percentile**) पध्दत लागू आहे. प्रस्तुत परीक्षेमध्ये सर्वाधिक गुण मिळविणा-या उमेदवारांच्या एकूण गुणांच्या खालीलप्रमाणे किमान गुण प्राप्त करणारे उमेदवार शिफारशीसाठी पात्र असतील :-

(१) **अमागास- किमान ३५ शतमत**

(२) **मागासवर्गीय -किमान ३० शतमत**

(३) **विकलांग- किमान १० शतमत**

(४) **अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू – किमान २० शतमत**

**१०. ३** विकलांग अथवा अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू या प्रवर्गाच्या किमान सीमारेषेच्या आधारे शिफारशीसाठी पात्र ठरणा-या उमेदवारास कोणतीही एक सवलत घेता येईल.

**१०.४** परीक्षेस उपस्थित राहिलेल्या उमेदवारांना शिफारसीनंतर त्यांची नियुक्तीसाठी शासनाकडे शिफारस करण्यात आली आहे किंवा नाही, ते ईमेलद्वारे कळविण्यात येईल. तसेच, शिफारस झालेल्या उमेदवारांची नावे आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात येतील.

************